मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत कार्यपुर्तता अहवाल तपासणी तथा कामाच्या शे-यांचे दर्जोन्नती करण्याची कार्यपद्धती निश्चित करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**

**ग्राम विकास विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांकः मुग्रायो-२०२४/प्र.क्र.३१२ /बांधकाम-४**

बांधकाम भवन, ५ वा मजला, २५ मर्झबान पथ,

फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१

दिनांक : १० मे, २०२४.

**वाचा:**

1. **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** ग्रासयो-३०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दिनांक २८ ऑक्टोबर, २०१५.
2. **शासन परिपत्रक, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०१७/प्र.क्र.१५४/पंरा-७, दिनांक ०७ ऑक्टोबर, २०१७.
3. **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** ग्रासयो-२०२१/प्र.क्र.१६५/बांध-४, दिनांक ०६. जानेवारी २०२२.
4. **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो २०२२/प्र.क्र.१९/बांध-४, दिनांक २६ सप्टेंबर, २०२२.
5. **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो २०२३/प्र.क्र.४३६/बांध-४, दिनांक १५ फेब्रुवारी २०२४.

**परिपत्रक :**

मुख्यमंत्री ग्रामसडक योजने अंतर्गत कामाची गुणवत्ता तपासण्यासाठी केंद्र शासन पुरस्कृत प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर त्रिस्तरीय गुणवत्ता तपासणी पध्दत अवलंबिण्यात येत आहे. त्यास अनुसरुन राज्य गुणवत्ता निरिक्षक (SQM) यांच्या तपासणी अहवालाबाबतची तसेच वरिष्ठ राज्य गुणवत्ता निरिक्षक (SSQM) यांच्या तपासणी अहवालाच्या बाबत आवश्यक कार्यवाही करणेबाबतची कार्यपध्दती विभागाच्या संदर्भ क्र. ०२ येथील परिपत्रकान्वये निश्चित करण्यात आली आहे.

सदर कार्यपध्दतीचा आढावा घेऊन त्यात NRIDA मार्फत प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेमध्ये वेळोवेळी करण्यात आलेल्या सुधारणांच्या धर्तीवर आवश्यक बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेंतर्गत कार्यपुर्तता अहवाल तपासणी तथा कामाच्या शे-यांचे दर्जोन्नती करण्याची कार्यपद्धती निश्चित करण्यात येत आहे.

**अ) राज्य गुणवत्ता निरिक्षक यांच्या तपासणी अहवालाबाबत करावयाची कार्यवाही :-**

१) राज्य गुणवत्ता निरिक्षक यांचेकडुन मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत रस्त्याच्या कामांची टप्पेनिहाय तपासणी करुन अहवाल राज्य गुणवत्ता समन्वयक तसेच संबंधीत कामाचे कार्यकारी अभियंता व अधिक्षक अभियंता यांना सादर केले जावेत.

२) सदर अहवालानुसार ज्या रस्त्याच्या कामांना राज्य गुणवत्ता निरिक्षक यांचेकडुन समाधानकारक तथा सुधारणा आवश्यक (SRI) शेरा दिला जातो, अशा कामांचे कार्यपुर्तता अहवाल (Action Taken Report )संबंधीत कामाचे कार्यकारी अभियंता यांचे मार्फत राज्य गुणवत्ता समन्वयक कार्यालयास थेट सादर केले जावेत.

३) तथापि, ज्या रस्त्याच्या कामांना राज्य गुणवत्ता निरिक्षक यांचेकडुन असमाधानकारक (U) शेरा दिला जातो, अशा कामांचे कार्यपुर्तता अहवाल संबंधित कामाचे कार्यकारी अभियंता यांनी तयार करुन ते क्षेत्रिय अधिक्षक अभियंता यांचे शिफारशीसह राज्य गुणवत्ता समन्वयक कार्यालयास सादर केले जावेत.

४) सदर कार्यपुर्तता अहवालाची तांत्रिक छाननी करुन अहवालाची दर्जोन्नती राज्य गुणवत्ता समन्वयक यांचेकडुन केली जावी.

**ब) वरिष्ठ राज्य गुणवत्ता निरिक्षक यांच्या तपासणी अहवालाबाबत करावयाची कार्यवाही :-**

१) वरिष्ठ राज्य गुणवत्ता निरिक्षक यांनी मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेअंतर्गत रस्त्याच्या कामांची तपासणी करुन तपासणी अहवाल राज्य गुणवत्ता समन्वयक तसेच संबंधीत कामाचे कार्यकारी अभियंता व अधीक्षक अभियंता यांचेकडे सादर करण्यात यावेत.

२) सदर अहवालानुसार ज्या रस्त्याच्या कामांना वरिष्ठ राज्य गुणवत्ता निरिक्षक यांचेकडुन समाधानकारक तथा सुधारणा आवश्यक (SRI) शेरा दिला जातो. अशा कामांचे कार्यपुर्तता अहवाल (Action Taken Report ) संबंधित कामाचे कार्यकारी अभियंता यांचेकडुन प्रथम अन्य राज्य गुणवत्ता निरिक्षक यांचेकडुन शेरे पुर्ततेबाबत पडताळणी करुन तद्नंतर ते राज्य गुणवत्ता समन्वयक कार्यालयास सादर केले जावेत.

३) तसेच ज्या रस्त्याच्या कामांना राज्य गुणवत्ता निरिक्षक यांचेकडुन असमाधानकारक (U) शेरा दिला जातो, अशा कामांचे कार्यपुर्तता अहवाल संबंधित कामाचे कार्यकारी अभियंता यांनी प्रथम अन्य राज्य गुणवत्ता निरिक्षक यांचेकडुन शेरे पुर्ततेबाबत पडताळणी करुन तदनंतर ते क्षेत्रिय अधीक्षक अभियंता यांचे शिफारशीसह राज्य गुणवत्ता समन्वयक कार्यालयास सादर केले जावेत.

४) सदर कार्यपुर्तता अहवालाच्या तांत्रिक छाननी पश्चात राज्य गुणवत्ता समन्वयक यांची दर्जोन्नत करणेबाबत शिफारशीसह मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांचेकडे सादर करण्यात यावेत. अहवालात त्रुटी असल्यास राज्य गुणवत्ता समन्वयक यांचेकडुन अहवाल पुनश्च त्रुटी पुर्ततेसाठी कार्यकारी अभियंता यांचेकडे पाठविण्यात यावा.

५) राज्य गुणवत्ता समन्वयक यांचेमार्फत प्राप्त कार्यपुर्तता अहवालाची मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) कार्यालयात अंतिम छाननी करून अहवालाची दर्जोन्नती विषयक कार्यवाही करण्यात यावी.

**क) कार्यपूर्तता अहवाल सादर करणेबाबत प्रस्तावित कालावधी :-**

१) प्रगतीपथावरील व पुर्ण झालेल्या कामांचे कार्यपुर्तता अहवाल हे कोणत्याही परिस्थितीत तपासणीच्या तारखेपासुन सहा महिन्यांचे आत तर दोषदायित्व कालावधीतील कार्यपुर्तता अहवाल तपासणीच्या तारखेपासुन तीन महिनेच्या आत सादर होणे आवश्यक आहे. कार्यपुर्तता करण्यास काही अडचणी जसे की, Force Majeure, न्यायालयीन बाबी, वन विभागाची परवानगी, इतर वादांकरीता स्थगिती असल्यास कार्यपुर्तता अहवाल सादर करण्याची मुदत, संबंधीत बाबीचे निरसन होईपर्यंत वाढविण्यात येईल. वरिष्ठ राज्य गुणवत्ता निरिक्षक तसेच राज्य गुणवत्ता निरिक्षक यांचे प्रगतीपथावरील व पूर्ण झालेल्या कामांचे कार्यपुर्तता अहवाल सादर करणेस ६ महिन्यापेक्षा अधिक विलंब झाल्यास व दोषदायित्व कालावधीतील कार्यपुर्तता अहवाल सादर करणेस ३ महिन्यापेक्षा अधिक विलंब झाल्यास सदर विलंबाच्या कारणासह व

आनुषंगिक कागदपत्रे / छायाचित्रे इ. सह अहवाल सादर करणे आवश्यक राहिल. तथापि अशा विलंबाने प्राप्त अहवाल छाननी करुन राज्य गुणवत्ता समन्वयक हे मुख्य अभियंता, (प्रमंग्रासयो) यांचेकडे सादर करतील व त्याच्या दर्जोन्नतीबाबात सर्व अधिकार मुख्य अभियंता यांना असतील.

२) दि. १ एप्रिल २०२४ नंतर तपासणी झालेल्या प्रत्येक कामास या तरतुदी लागु राहतील. आज रोजी प्रलंबित कार्यपुर्तता अहवाल हे ३१ मे, २०२४ पर्यंत सादर न झाल्यास अशा सर्व कामांना देखील उपरोक्त तरतुदी लागु राहतील.

३) प्रगतीपथावरील व पुर्ण झालेल्या कामांचे कार्यपुर्तता अहवाल सादर करण्यास एक वर्षापेक्षा अधिक विलंब झाल्यास व दोषदायित्व कालावधीतील कार्यपुर्तता अहवाल सादर करणेस ६ महिन्यापेक्षा अधिक विलंब झाल्यास व त्याकरिता सादर केलेले खुलासा समाधानकारक नसल्यास अथवा आवश्यक कागदपत्रे छायाचित्रे इत्यादी बाबींसह सादर न केल्यास संबधित कार्यकारी अभियंता यांचेवर सक्षम प्राधिकाऱ्यांमार्फत शिस्तभंगविषयक कार्यवाही प्रस्तावित करण्यात येईल.

०२. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०५१०१२१८२५६१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.05.10 13:16:29 +05'30'

**( प्रशांत पाटील )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) प्रधान सचिव (ग्रा.वि. व पं.रा.), यांचे स्वीय सहाय्यक, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) मुख्य अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.
४) अधीक्षक अभियंता, (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व विभाग.
५) कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व जिल्हे.
६) वित्तीय नियंत्रक, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) माहिती तंत्रज्ञान अधिकारी, प्रधानमंत्री/मुख्यमंत्री ग्रामसडक योजना, महाराष्ट्र राज्य.
८) निवड नस्ती, कार्यासन बांध-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.